कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत सन २०१८-१९ करिता अन्नधान्य पिकांतर्गत कडधान्य पिकाचे उत्पादन वाढीसाठी क्षेत्र विस्तार (वाढीव) कार्यक्रम राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असुअ-२०१८/प्र.क्र.६९/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २०१८

वाचा:-

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. ०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि.२७/०४/२०१८.
२. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण/२०१७-प्र.क्र.३१/१७-अे, दि. १९/०४/२०१७.
३. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र Do No./१-२२०१८ §NFSM दि. २६/०२/२०१८
४. कृषी आयुक्तालयाचे पत्र NFSM/extn-१/AAP-२०१८-१९/F.no.०१/९८/१८, दि.०९/०३/२०१८.
५. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग ,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय ,भारत सरकार यांचे पत्र No.२ -१६/२०१८ NFSM, दि. ०१/०५/२०१८
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. असुअ-१०१८/प्र.क्र.४६ /४-अे, दि.०९/०५/२०१८.
७. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग ,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय ,भारत सरकार यांचे पत्र No.२०-२७/२०१७-NFSM(CA-V), दि.१६/०५/२०१८.
८. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/वि.प्र.१/रासअसु/निवि१८१९/२२६/१८, दि.३१/०५/२०१८.
९. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. असुअ-१०१८/प्र.क्र.६९ /४-अे, दि.०४/०६/२०१८.
१०. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/वि.प्र.१/रासअसु/निवि१८१९/२३५/१८, दि.१४/०६/२०१८.
११. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/वि.प्र.१/वाढीव कार्य./प्र.क्र.२१/३४१/१८, दि.२५/१०/२०१८.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियांतर्गत समाविष्ट पिकांच्या उत्पादन व उत्पादकतेत वाढ करणे, शेत जमिनीची सुपीकता व उत्पादकता वाढविणे, रोजगारांची संधी निर्माण करणे व शेतक-यांच्या उत्पादनात वाढ करणे ही प्रमुख्य उद्दीष्ट आहेत.

सन २०१८-१९ करीता केंद्र शासनाने महाराष्ट्राकरीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी (भात, गहू, कडधान्य व पौष्टिक तृणधान्ये (Nutri Cereals)) ₹ २३९८९.६८५ लाख रकमेचा कृती आराखडा मंजूर केला. त्यास केंद्र शासनाने संदर्भांकित दि.०१/०५/२०१८ रोजीच्या पत्रान्वये मंजूरी दिली आहे.

त्यानुसार सदर रु.२३९८९.६८५ लाख (केंद्र हिस्सा रु.१४३९३.८११ लाख+राज्य हिस्सा रु.९५९५.८७४ लाख) रकमेच्या कृती आराखडयास दिनांक ०९/०५/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

तद्नंतर केंद्र शासनाने दि.२२/१०/२०१८ रोजीच्या पत्रान्वये राज्यात सदर वाढीव कृती आराखडयास मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिकांतर्गत रु.१२००.००० लक्ष रकमेच्या वाढीव कार्यक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

**शासन निर्णयः**

१. सन २०१८-१९ करिता कृषि उन्नती योजनतंर्गत-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिकांतर्गत कडधान्य पिकांकरीता रु.१२००.००० लक्ष (केंद्र हिस्सा रु.७२०.००० + राज्य हिस्सा रु.४८०.००० लक्ष) रकमेच्या वाढीव कार्यक्रमास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर वाढीव कार्यक्रमाचे घटक/उपघटक निहाय मंजूर आर्थिक व भौतिक लक्ष्यांकाचे विवरण सोबतच्या परिशिष्ट “अ" मध्ये नमूद केले आहे. सदर अभियानाची केंद्र व राज्याच्या ६०:४० आर्थिक सहभागाच्या प्रमाणात अंमलबजावणी करण्यात यावी.

३. सदर अभियानाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचा निधी ६०:४० प्रमाणात वेळोवेळी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि ) यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर निधी केंद्र व राज्य हिस्स्याच्या उपलब्ध लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. अभियानांतर्गत संदर्भाधिन दि.०९ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयातील दिशा निर्देशानुसार सदर रु.१२००.००० लाख रकमेच्या वाढीव कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३११५४११२३४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.10.31 15:47:50 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.

३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२. सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१३. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१४. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१९. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती-४अे.

**परिशिष्ट-अ**

**सन २०१८-१९ करिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-कडधान्य पिकांसाठी वाढीव कार्यक्रम**

**(रु.लाख)**

| अ. क्र. | तपशिल | अनुदानाचा दर | परिणाम | केंद्राकडून मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | **सुधारीत तंत्रज्ञानावर अधारीत प्रात्यक्षिके -** | | | | |
| | सलग प्रात्यक्षिके - हरभरा | रु. ९००० प्रती हेक्टर | हेक्टर | १००० | ९०.००० |
| | **एकूण १** | | | | **९०.०००** |
| २ | **प्रमाणित बियाणे वितरण-** | | | | |
| | हरभरा | रु.२५०० किंवा किमतीच्या ५०टक्के जे कमी असेल ते | क्विंटल | ३४८०० | ८७०.००० |
| | **एकूण २** | | | **३४८००** | **८७०.०००** |
| ३ | **संसाधन संवर्धन तंत्र/साधने (कृषी औजारे)** | | | | |
| | अ)पेरणी यंत्र (Seed Drill) (Above ३५ BHP) | रु.२०००० किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | संख्या | ५०० | १००.००० |
| | ब) प्रभावी सिंचन साधने- पंप संच | रु.१०००० किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | संख्या | १४०० | १४०.००० |
| | **एकूण ३** | | | **५००** | **२४०.०००** |
| **एकूण एकंदर** | | | | | **१२००.०००** |
| | | | | **केंद्र हिस्सा** | **७२०.०००** |
| | | | | **राज्य हिस्सा** | **४८०.०००** |